पुराभिलेख संचालनालयातील कार्यालयीन कामाकरीता नवीन संगणकासाठी लागणाऱ्या MS-OFFICE Standard २०१९ (Govt. Edition) खरेदीस मान्यता देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांक- मपुवि-२०१९/प्र.क्र.१२५/सां.का.२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक : ०६ जानेवारी, २०२०.

वाचा : (१) उद्योग, उर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०१६/प्र.क्र.२१५/ उद्योग-४, दि. २४ ऑगस्ट, २०१७.
(२) उद्योग, उर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्र. भांखस-२०१७/प्र.क्र.२०४/ उद्योग-४, दि. ०८ डिसेंबर, २०१७.
(३) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०१९/प्र.क्र.९२/अर्थ-३, दि.०८ जूलै, २०१९.
(४) संचालक, पुराभिलेख संचालनालय यांचे पत्र क्र.भांडार/२०१९-२०/३६०८, दि.१२ डिसेंबर, २०१९.

**शासन निर्णय**-

पुराभिलेख संचालनलायातील कार्यालयीन कामाकरीता नवीन संगणकासाठी लागणाऱ्या MS-OFFICE Standard २०१९ (Govt. Edition) केंद्र शासनाने विकसित केलेल्या गर्व्हमेंट ई मार्केटप्लेस (GeM) पोर्टलची कार्यपध्दतीनुसार खरेदी करण्यासाठी येणाऱ्या रु.५,६१,३००/-(अक्षरी रुपये पाच लाख ऐकसष्ट हजार फक्त) इतक्या रकमेच्या खर्चास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

आता या शासन निर्णयान्वये **रु.५,६१,०००/- (अक्षरी रुपये पाच लाख ऐकसष्ट हजार फक्त)** इतक्या रकमेच्या खर्चास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्यात येत आहे.

**०२.** संचालक, पुराभिलेख संचालनालय, यांनी येथील उद्योग, उर्जा व कामगार विभागाने केंद्र शासनाने विकसित केलेल्या गर्व्हमेंट ई मार्केटप्लेस (GeM) पोर्टलची कार्यपध्दतीनुसार वेळोवळी निर्गमित केलेल्या शासन निर्णयातील तरतूदीनुसार सदरची खरेदी प्रक्रीया करण्यात यावी.

**०३.** संचालक, पुराभिलेख संचालनालय, यांना यासाठी नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत असून त्यांना अथवा त्यांनी प्राधिकृत केलेल्या अधिकाऱ्यास यासंबंधीच्या देयकावर स्वाक्षरी करण्यास प्राधिकृत करण्यात येत आहे.

**०४.** हा शासन निर्णय विअप्र २०१३/प्र.क्र.३०/२०१३ /विनियम, भाग-२, दिनांक १७ एप्रिल, २०१५ वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ भाग-२, अ.क्र. २७-अ, नियम क्र. ७६ नुसार तसेच वित्त विभागाचे परिपत्रक क्रमांक अर्थसं -२०१९/प्र.क्र.९२/अर्थ-३, दिनांक ०८ जूलै, २०१९ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकाराच्या अधिन राहून निर्गमित करण्यात येत आहे.

**०५.** यासाठी होणारा खर्च मागणी क्र. झेडडी-२, २२०५ कला व संस्कृती, १०४, पुराभिलेख, (०१) (०२) पुराभिलेख कार्यालये (अनिवार्य) (२२०५ १७९५) २१ पुरवठा व सामग्री या लेखाशिर्षाखाली सन २०१९-२० या वित्तीय वर्षात मंजूर करण्यात आलेल्या तरतुदीतून भागविण्यात यावा.

**०६.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२००१०६१७०३२०४७२३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने सांक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

Digitally signed by Sawant Balasaheb Ishwar
Date: 2020.01.06 16:59:41 +05'30'

**( बाळासाहेब ईश्वर सावंत )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. संचालक, पुराभिलेख संचालनालय, मुंबई.
२. सहाय्यक संचालक (प्रशासन), पुराभिलेख संचालनालय, मुंबई.
३. महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परिक्षा),मुंबई.
४. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
५. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
६. कार्यासन अधिकारी, (अर्थसं.) पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. निवड नस्ती, सां.का.२.